वन विभागामार्फत केल्या जाणा-या विविध कामांची मजूरी संबंधित मजूरांना एक महिन्याच्या आत वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२३/प्र.क्र.१६/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १० एप्रिल, २०२३

**प्रस्तावना :-**

राज्याच्या वन विभागातील विविध क्षेत्रीय घटकांमार्फत वनक्षेत्रावर वृक्ष लागवड, वनसंवर्धन, वन्यप्राणी संवर्धन व व्यवस्थापन, इ. कामे तसेच कार्यआयोजनेतील/व्यवस्थापन आराखड्यातील तरतूदीनुसार कामे हाती घेतली जातात. याशिवाय वन विभागाच्या सामाजिक वनीकरण शाखेमार्फत वनेतर क्षेत्रावरही कामे हाती घेतली जातात. वन विभागाकडील कामे ही बहुतांश दुर्गम भागात, आदिवासी क्षेत्रात केली जातात. तसेच या कामांचा बराचसा हिस्सा हा मजूरांमार्फत पूर्ण केला जातो. वनविभागात विविध कामांवर रोजंदारीवर काम करणा-या मजूरांना ठराविक वेळेत मजूरी अदा केली जाईल याबाबतचे निर्देश देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वन विभागाच्या विविध शाखेअंतर्गत करण्यात येणारी कामे कार्यक्रम व अनिवार्य योजनांतर्गत विविध राज्यस्तरीय योजना / जिल्हास्तरीय योजना/ केंद्र पुरस्कृत योजना/केंद्रीय योजना/ कॅम्पा इत्यादी योजनांतर्गत केली जातात. सदर कामांसाठी लावण्यात आलेल्या मजूरांना त्यांनी केलेल्या कामांची मजूरी एक महिन्याच्या आत त्यांना अदा करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

२. प्रस्तुत निर्णयाच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने सर्व संबंधित क्षेत्रीय अधिकारी यांनी खालीलप्रमाणे विहित कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

- सर्वप्रथम कामांचा कृती आराखडा तयार करावा.
- अर्थसंकल्पीय वार्षिक अंदाजपत्रक तयार करावे.
- वार्षिक योजना तयार करावी किंवा वेळेवर येणा-या कामांसाठी प्रस्ताव तयार करावा.
- कामांची अंदाजपत्रके तयार करून त्यास सक्षम प्राधिका-याकडून तांत्रिक व प्रशासकीय मान्यता घेण्याची कार्यवाही करावी.
- कामांना मंजूरी प्राप्त करून घेऊन कामांना निधी उपलब्ध करून घेण्याची कार्यवाही करावी.
- निधी उपलब्ध झाल्यानंतर काम सुरू करण्याकरीता संबंधित उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी / उपविभागीय वन अधिका-यांनी कार्यारंभ आदेश/ कार्यादेश जारी करणे व त्यानंतरच सदरच्या कामावर वनक्षेत्रपाल यांनी मजूर लावून काम करुन घ्यावे.

उपरोक्त कार्यपध्दतीची काटेकोरपणे अंमलबजावणी केली जाईल याची संपुर्ण जबाबदारी संबंधित उपवनसंरक्षक व मुख्य वनसंरक्षक यांची राहील. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांनी कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन होण्याकरीता मासिक आढावा घ्यावा.

३. प्रस्तुत निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी संबंधित आर्थिक वर्षात मजूरांमार्फत करण्यात येणाऱ्या कामांचे सुयोग्य नियोजन करणे, त्याचप्रमाणे आर्थिक तरतूद, Fund Flow व शिल्लक निधी विचारात घेऊन दरमहा मजूरीकरीता आवश्यक निधीबाबतचे सुक्ष्म नियोजन करणे, मजूरीकरीता आवश्यक निधी मजूरांना विहित कालावधीत अदा करण्यासाठी तो निधी संबंधित कार्यालयास योग्य वेळेत उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची राहील.

**४.** सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून वन विभागाच्या विविध घटकांमार्फत वन व वनेत्तर क्षेत्रावर करण्यात येणा-या विविध कामावरील सर्व मजूरांना कामांची मजूरी एक महिन्याच्या आत अदा करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांची राहील. यासंबंधाने दिरंगाई झाल्यास संबंधीत उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी/ सहा. वनसंरक्षक/ वनक्षेत्रपाल यांना यासाठी जबाबदार धरण्यात येईल.

**५.** वन विभागामार्फत केल्या जाणा-या विविध कामांसाठी लावल्या जाणा-या मजूरांसंदर्भात अद्ययावत माहिती तात्काळ उपलब्ध होण्याच्या दृष्टीने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सर्वसमावेशक online प्रणाली विकसित करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१६०११३२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2023.04.10 16:07:04 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा सदस्य सचिव, जैवविविधता मंडळ, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर.
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
१०) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/ वन्यजीव) (सर्व).
११) वनसंरक्षक आणि उप वनसंरक्षक (सर्व)
१२) विभागीय वन अधिकारी (सर्व)
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४) मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५) वन विभागाचे सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.